केंद्र शासनाच्या कृषी उन्नती योजना - राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान - व्यापारी पिके (कापूस, ऊस) अंतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी निधी वितरीत करण्याबाबत.

कापूस - (केंद्र हिस्सा - २४०१ A५७५)
(राज्य हिस्सा - २४०१ A ५८४)
ऊस - (केंद्र हिस्सा - २४०१ A५९३)
(राज्य हिस्सा - २४०१ A ६०१)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२२/प्र.क्र.७/कार्यासन ६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : - १७ फेब्रुवारी, २०२३.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२ व दि.०८.०२.२०२३.
२) आदिवासी विकास विभाग शा.नि.क्र.बीयुडी-२०२२/प्र.क्र.७/कार्या-६, दि.७.१०.२०२२.
३) केंद्र शासनाचे पत्र क्र. F.No.२०-२७/२०१७-NFSM (CA-V), Dt.२९.११.२०२२.
४) कृषी व पदुम विभागाची नस्ती क्र.राअसुअ-२०२२/प्र.क्र.९५/४-अे.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत कृषी व पदुम विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय सुरक्षा अभियानांतर्गत व्यापारी पिकांसाठी सन २०२२-२३ या वर्षाकरीता दुसऱ्या हप्त्यासाठी प्राप्त झालेला झालेला केंद्र हिस्सा रु.९.४५ लाख (कापूस - रु.५.८५ लाख व ऊस - रु.३.६० लाख) व समरुप राज्य हिस्सा रु.६.३० लाख (कापूस-रु.३.९० लाख व व ऊस - २.४० लाख) असा एकूण रु.१५.७५ लाख इतका निधी सन २०२२-२३ च्या अर्थसंकल्पित तरतुदींतून वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत कृषी व पदुम विभागाकडून संदर्भाधीन क्र.४ अन्वये सादर करण्यात आलेल्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ याखाली मुख्य लेखाशीर्ष २४०१-कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय सुरक्षा अभियानांतर्गत व्यापारी पिकांकरीता (कापूस व ऊस) सन २०२२-२३ या वर्षाकरीता दुसऱ्या **हप्त्यासाठी प्राप्त झालेला केंद्र हिस्सा रु.९.४५ लाख** (कापूस - रु.५.८५ लाख व ऊस-रु.३.६० लाख) **व समरुप राज्य हिस्सा रु.६.३०** लाख (कापूस-रु.३.९० लाख व व ऊस-२.४० लाख) असा **एकूण रु.१५.७५ लाख इतका निधी** इतका निधी सन २०२२-२३ मधील अर्थसंकल्पित तरतुदींमधून वितरीत व खर्च करण्यास खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे :-

(रु.लाखात)

| योजनेचे नाव | व्यापारी पिके | लेखाशिर्ष व केंद्र/राज्य हिस्सा | बाब | सन २०२२-२३ मधील अर्थसंकल्पित तरतूद | यापूर्वी वितरीत निधी | सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | | ६ |
| कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय सुरक्षा अभियान **व्यापारी पिके (कापूस व ऊस)** | कापूस | २४०१ A ५७५ केंद्र हिस्सा | ३३, अर्थसहाय्य | २६.०० | ५.८५ | ५.८५ |
| | | २४०१ A ५८४ राज्य हिस्सा | | १७.०० | ३.९० | ३.९० |
| | ऊस | २४०१ A ५९३ केंद्र हिस्सा | | ३०.०० | ३.६० | ३.६० |
| | | २४०१ A ६०१ राज्य हिस्सा | | २०.०० | २.४० | २.४० |
| | **एकूण** | | | **९३.००** | **१५.७५** | **१५.७५** |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.१५.७५ लाख (अक्षरी रुपये पंधरा लाख पंच्याहत्तर हजार फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, कृषी विभाग यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना नियंत्रक अधिकारी यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०४.०४.२०२२ व दि.०८.०२.२०२३ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी व निधी उपयोगिता प्रमाणपत्रासह पुढील निधी वितरणासाठी प्रस्ताव सादर करावा.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी सदरचा खर्च आदिवासी उपयोजना क्षेत्रातच नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. तसेच विमा हप्त्याचे प्रदान करताना शासनाने वेळोवेळी दिलेल्या निर्देशांचे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

६. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतून आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात तथापि, आदिवासी उपयोजना बाहय क्षेत्रात मात्र वैयक्तिक लाभाच्याच योजना घेण्यात याव्यात.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.६८/२०२३ दि.०२.०२.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२२०१२४२०७३०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2023.02.20 16:31:37 +05'30'

**(राजेंद्र दे.भवारी)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव, कृषी विभाग, मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
४. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग
५. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
६. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०.निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.